ऑर्किड मल्टी सुपरस्पेशालिटि हॉस्पिटलजळगाव ,
या खाजगी रुग्णालयास वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीसाठी
शासन मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१४/प्र.क्र.१३७/१४/राकावि-२**
गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार, १० वा मजला, बि विंग
मंत्रालय, मुंबई-४००० ०१.
तारीखः २० मे, २०१४

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. जीरुखा-२०००/प्र.क्र. १०१ / आरोग्य-३, दिनांक २६.९.२०००**
२) **शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी-२००८/९/प्र.क्र.१/ आरोग्य-३, दिनांक १९.३.२००५.**
३) **आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र.संआसे/खा.रू.शा.मान्यता/ ऑर्किड हॉस्पिटल / कक्ष -८/टे-१/न.क्र.व्ही. -१८/०८/२०१४, दि.२६ मार्च, २०१४**

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्या अनुषंगाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमानुसार ऑर्किड मल्टी सुपरस्पेशालिटी हॉस्पिटल, जळगाव या रुग्णालयास राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना हृदय शस्त्रक्रिया हृदय उपमार्ग शस्त्रक्रिया ( बायपास व इतर रक्तवाहिन्यांवरील शस्त्रक्रिया ), अँजिओप्लास्टी व इतर कार्डिओ वास्कूलर इंटरव्हेन्शन, ऑन्को सर्जरी या आजारांवर उपचार व शस्त्रक्रिया करण्याकरिता व त्याप्रित्यर्थ होणा-या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर रुग्णालयाने खालील अटींचे प्रकर्षाने पालन करणे आवश्यक राहील.

१) मुंबई सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५०मधील कलम ४१ अे नुसार १०% रूग्णांवर मोफत व १०% रूग्णांवर सवलतीच्या दराने उपचार करणे.
२) मुंबई शुश्रुषा गृहे अधिनियम १९४९ अन्वये विहित केलेल्या निकषानुसार प्रशिक्षित वैद्यकीय अधिकारी व कर्मचारी वर्ग उपलब्ध करणे.
३) ज्या आजारावर उपचार करण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे. त्या आजाराचे संशोधन करण्यासाठी तसेच चाचण्या अंती झालेल्या निदानानुसार शस्त्रक्रिया करण्यासाठी आवश्यक ती यंत्रसामुग्री रूग्णालयामध्ये उपलब्ध असणे.
४) शासकीय रुग्णालयात ज्या दराने फी आकारली जाते, त्या दराने फी आकारली जावी.
५) केंद्र शासन, राज्य शासनामार्फत कार्यान्वित केलेल्या राष्ट्रीय कार्यक्रमांच्या मोहिमेमध्ये सक्रीय सहभाग घेणे आवश्यक आहे.
६) सदर रुग्णालयाने मुंबई नर्सिंग होम ॲक्टनुसार नोंदणीचे वेळोवेळी नुतनीकरण करणे आवश्यक राहील.

२. वरीलप्रमाणे मान्यता दिलेल्या आजारांसंबधीच्या उपचार व शस्त्रक्रियेकरीता सदर रुग्णालयाने आकारलेल्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती विहीत नियमानुसार अनुज्ञेय राहील. अतितात्काळ बाब वगळता सदर रुग्णालयातील मान्यताप्राप्त उपचाराखेरीज अन्य कोणत्याही औषधोपचारासाठी शासकीय कर्मचा-यास प्राधिकृत वैद्यकीय अधिका-याची पुर्वसंमती घेणे आवश्यक राहील.

३.. हा शासन निर्णय मा. मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.सभापती व मा.उपसभापती महाराष्ट्र विधान परिषद, मा. अध्यक्ष व मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडहाचे मा. विरोधी पक्षनेते तसेच महाराष्ट्र विधानसभा/परिषदेचे विद्यमान सदस्य, माजी सदस्य, उच्च न्यायालयाचे न्यायाधीश आणि त्यांच्या कुटुंबियांना सुध्दा लागू राहील.

४. सदर शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००४१७३००८७५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2014.10.29 15:53:34 +05'30'

**(ज्ञा.ल.सुळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
३. मंत्री ( आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. राज्यमंत्री ( आरोग्य ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग.
७. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव ( सर्व मंत्रालयीन विभाग) मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१०. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
११. विभागीय आयुक्त/ (सर्व)
१२. पोलीस आयुक्त/पोलीस अधिक्षक ( ग्रामीण ) - (सर्व)

१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता)/( लेखा व परीक्षा), मुंबई.

१५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता)/( लेखा व परीक्षा),नागपूर.

१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१७. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

. १८संचालक ,आरोग्य सेवा संचालनालय.मुंबई ,

. १९संचालक.मुंबई ,वैद्यकीय शिक्षण व संशोधन ,

. २०संचालक.मुंबई ,आयुर्वेद ,